**पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातंर्गत “क”  वर्ग नस्त्या स्कॅन करण्यास तसेच अभिलेखाचे संगणकीकरण** Digitization **करीता सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :** WSSD-२६०२२(२२)/१/२०२३-WSD-(COMPUTER CELL)-Water supply and Sanitation

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
गो.ते.रुग्णालय संकुल इमारत ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई  ४०० ००१.
**तारीख : ०५ जूलै, २०२३.**

वाचा :- शासन निर्णय क्र. संगणक-२०२२/प्र.क्र. २७/संगणक शाखा, दिनांक ०१ जून, २०२३.

**प्रस्तावना :-**

शासनाने ई-ऑफीस प्रणालीचा वापर करण्याबाबत दिलेल्या सुचनेनुसार विभागामार्फत कार्यवाही करण्यात येत आहे. या कार्यवाहीमध्ये अभिलेखाचे संगणकीकरण Digitization  करण्याकरीता “अ” व “ब” वर्ग तसेच कार्यवाही सुरु असलेल्या नस्त्यांचे स्कॅनिंग करुन घेण्यात आले आहे. दिनांक ३०.०५.२०२३ रोजी प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीमध्ये विभागातील आवश्यक “क” वर्ग नस्त्या स्कॅन करुन “अ” व “ब” वर्ग नस्ती प्रमाणेच रोडमॅप करून जतन करण्यास समितीने मान्यता दिली आहे. त्यास अनुसरुन या कामकाजासाठी होणाऱ्या खर्चाकरीता दिनांक ०१ जून, २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती.

परंतू, अभिलेख फक्त स्कॅन न करता त्यामध्ये Metadata Field (Per image /page) इ. अंतर्भाव करून अभिलेखाचे Digitization करून सुनियोजीत जतन करणे आवश्यक आहे. तसेच पाणीपुरवठा विभागांतर्गत कार्यासनांमधील मान्यतेसाठी सादरीकरणात असलेल्या फिजीकल नस्त्या, विभागीय चौकशीची प्रकरणे, न्यायालयीन प्रकरणांबाबतच्या नस्त्या, रोख शाखेमधील सर्व कागदपत्रे, (यापूर्वी सेवानिवृत्त अधिकारी / कर्मचारी यांचेशी निगडीत कागदपत्रे जे विभागास जतन करून ठेवणे आवश्यक आहे अशा बाबी स्कॅन करणे प्रलंबित आहे.)  सबब, याकरीता सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

दिनांक ३०.०५.२०२३ रोजी प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीमध्ये विभागातील आवश्यक “क” वर्ग नस्त्या स्कॅन करुन “अ” व “ब” वर्ग नस्ती प्रमाणेच रोडमॅप करून जतन करण्यास समितीने मान्यता दिली

आहे. तसेच सदर अभिलेखांचे Digitization Services सुनियोजीत जतन करणे, तसेच काही अपरिहार्य कारणांमूळे स्कॅन करण्यात न आलेल्या प्रलंबित नस्त्या स्कॅन करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे. तसेच याबाबत होणाऱ्या खर्चास सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. "वाय-५-३४५१ सचिवालय आर्थिक सेवा (००) ०९० सचिवालय (०२) पाणी पुरवठा स्वच्छता विभाग (०२) (०२) ई-गव्हर्नन्स कार्यक्रमाची अंमलबजावणी (कार्यक्रम) (३४५१ २७६४)-१७ "संगणक खर्च" या लेखाशिर्षाखाली, सन २०२३-२४ मधील मंजूर अर्थसंकल्पीत तरतुदीमधून भागविण्यात येणार आहे.

०२. याबाबत उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. २०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४ दिनांक २४.०८.२०१७ मध्ये नमुद केल्याप्रमाणे व Gem पोर्टल वरील विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करुन निविदा प्रक्रिया राबवून कार्यवाही करण्यात येईल.

०३. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ विनियम, भाग-२ दिनांक १७.०४.२०१५ वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला उपविभाग दोन मधील अनुक्रमांक २७ ब नियम क्र. ७६ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार खरेदी करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०७०५१५१५४०४३२८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY VITHOBA KALBHOR

Digitally signed by SANJAY VITHOBA KALBHOR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=f38e777689de3b7f0254b419127daa9612b470f287aa6310645bf8f39ddb6811, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DF8236826D559FF6F7F76F1D6D59C70C92E9C010F48017078D824BE6D2B5B8D1, cn=SANJAY VITHOBA KALBHOR
Date: 2023.07.05 16:06:39 +05'30'

**(संजय काळभोर)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (रोखशाखेमार्फत),
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
४. वित्त विभाग, (व्यय-६), मंत्रालय, मुंबई,
५. सह सचिव (संगणक कक्ष), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. अवर सचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. निवडनस्ती (संगणक कक्ष).